**विविध व्यक्ती, संस्था आणि कंपनी यांना विविध प्रयोजनार्थ कब्जेहक्काने अथवा भाडेपट्टयाने प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीवरील इमारत बांधकामासाठी मुदतवाढ देण्याबाबत धोरणात्मक निर्देश............**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१६/प्र.क्र.२५४/ज-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक : ११ जानेवारी, २०१७**

**वाचा:-**

१. महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ चे कलम १३, २९, ३८ व ४०

२. महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम १९७१

३. शासन निर्णय, महसूल विभाग, क्र. एलएनडी-४८५७/ १६९१४६- AI, दिनांक २१.११.१९५७

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्यपूर्व काळात तसेच महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ अस्तित्वात येण्यापूर्वी राज्यातील शासकीय जमीनी विविध व्यक्ती, संस्था अथवा कंपनी यांना विविध प्रयोजनार्थ कब्जेहक्काने अथवा भाडेपट्टयाने प्रदान करण्यात आलेल्या आहेत. तद्ववतच महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम १९७१ मधील तरतूदीनुसार ही शासकीय जमीन विविध व्यक्ती, संस्था अथवा कंपनी यांना विविध प्रयोजनार्थ कब्जेहक्काने अथवा भाडेपट्टयाने वेळोवेळी प्रदान करण्यात आलेल्या आहेत. प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनींचा संबंधितांकडून शीघ्र गतीने वापर होऊन त्यातून राज्याचा सामाजिक व आर्थिक विकास व्हावा या उद्देशाने अशा शासकीय जमिनी मंजूर प्रयोजनार्थ अविलंब विकसित करण्याकामी त्यावर इमारत बांधकाम करण्यासाठी कालावधी विहित करण्यात येतो.

महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे), नियम १९७१ च्या नियम ४१ मध्ये प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीवरील बांधकामाबाबत पुढीलप्रमाणे तरतूद आहे:-

***"जमीन मिळाल्याच्या तारखेपासून ३ वर्षाच्या आत (अथवा जिल्हाधिकारी परवानगी देईल अशी आणखी मुदत) प्रतिग्रहीता जमिनीवर भरीव व कायमस्वरुपाची इमारत उभारील. यात कसूर झाली तर, प्रतिग्रहीताकडून देण्यात आलेल्या भोगवटा किंमतीपेक्षा अधिक नसेल इतकी नुकसानभरपाई दिल्यानंतर ती जमीन परत घेतली जाण्यास पात्र असेल."***

मात्र, उक्त तरतूद अस्तित्वात येण्यापूर्वीपासून प्रदान केलेल्या शासकीय जमिनीवरील शर्तभंगाची प्रकरणे नियमानुकूल करणे व इमारत बांधकामास मुदतवाढ देणे याबाबत शासन निर्णय, महसूल विभाग,

क्र. एलएनडी-४८५७/ १६९१४६-AI, दिनांक २१.११.१९५७ अन्वये सविस्तर सूचना देण्यात आलेल्या आहेत. सदर शासन निर्णय आजमितीस देखील अस्तित्वात आहे. या शासन निर्णयाच्या **परिच्छेद-२** च्या निर्देशातील **मुद्दा क्र.(४)** नुसार जमीन प्रदान केलेल्या तारखेच्या अकृषिक साऱ्याच्या १० पट अथवा,यथास्थिती २० पट अधिमूल्य आकारुन इमारतीच्या बांधकामासाठी जिल्हाधिकाऱ्यांच्या स्तरावरुन २ वर्षे मुदतवाढ देण्याची तरतूद आहे. उक्त शासन निर्णयाच्या **परिच्छेद-५** मध्ये असलेल्या तरतुदीच्या अनुषंगाने २ वर्षानंतर बांधकाम मुदतवाढ देण्याची प्रकरणे जिल्हाधिकाऱ्यांकडून शासनाकडे प्राप्त होतात. इमारत बांधकामासाठी मुदतवाढ देणे तसेच शर्तभंग नियमानुकूल करणे, याकरिता अधिमूल्य आकारण्याबाबत वेगवेगळया परिस्थितीमध्ये अधिमूल्याचे वेगवेगळे दर सदर शासन निर्णयान्वये निर्धारित करण्यात आलेले आहेत. तसेच सदर शासन निर्णयामध्ये इमारत बांधकामासाठी कमाल किती कालावधीसाठी आणि किती वेळा मुदतवाढ द्यावी, याबाबत कोणतीही स्पष्ट तरतूद नाही.

सद्य:स्थितीत उक्त नमूद दिनांक २१.११.१९५७ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वे विचारात घेऊन त्यामधील तरतुदीनुसार प्रकरणपरत्वे परिस्थितीनुसार अधिमूल्याची रक्कम आकारुन इमारत बांधकामासाठी मुदतवाढ देण्याची प्रकरणे शासनाकडून निर्णित करण्यात येतात. अशा प्रकरणांच्या अनुषंगाने असे निदर्शनास आले आहे की, संबंधित व्यक्ती अथवा संस्थेस शासकीय जमीन प्रदान झाल्यानंतर अशा जमिनीवर इमारतीचे बांधकाम संबंधित जमीन प्रदानाच्या आदेशामध्ये नमूद केलेल्या कालावधीत पूर्ण करणे अपेक्षित असताना अनेक प्रकरणी असे बांधकाम विहित मुदतीत न झाल्याने बांधकामास मुदतवाढीचे प्रस्ताव शासनास प्राप्त होतात. बऱ्याच वेळा इमारत बांधकामासाठी मुदतवाढीचे प्रस्ताव विलंबाने प्राप्त होतात अथवा शर्तभंग तपासणीच्या अनुषंगाने झालेल्या कार्यवाहीच्या वेळी निदर्शनास येतात. उक्त शासन निर्णयान्वये बांधकामासाठी मुदतवाढ देताना आकारावयाच्या अधिमूल्याचे दर सद्य:स्थितीत अतिशय कमी/नगण्य असल्याने तसेच कालांतराने जमिनीच्या किंमतीमध्ये मोठया प्रमाणावर वाढ होऊन प्रतिग्राहित्यास मोठया प्रमाणावर आर्थिक फायदा जमिनीच्या किंमतवाढीमुळे प्राप्त होत असल्याने बांधकाम विहित कालावधीमध्ये पूर्ण करण्याकडे संबंधित व्यक्ती/संस्थेचा कल दिसून येत नाही किंवा जमिनीचा लवकर उपयोग करण्याची तत्परता दिसून येत नाही. परिणामी, विहित मुदतीत शासकीय जमिनीचा विकास न झाल्यामुळे अपेक्षित सामाजिक/आर्थिक विकास साध्य होत नाही.

या पार्श्वभूमीवर, महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम १९७१ मधील तरतूदीनुसार किंवा तत्पूर्वी विविधव्यक्ती, संस्था अथवा कंपनी यांना विविध प्रयोजनार्थ कब्जेहक्काने अथवा भाडेपट्टयाने प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनींवरील इमारत बांधकामासाठी मुदतवाढ देण्याबाबत सुधारित धोरण आखणे क्रमप्राप्त झाले असून, या संदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम १९७१ मधील तरतूदीनुसार किंवा तत्पूर्वी विविध व्यक्ती, संस्था अथवा कंपनी यांना शासनाकडून विविध प्रयोजनार्थ कब्जेहक्काने अथवा भाडेपट्टयाने प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनींवरील इमारत बांधकामासाठी मुदतवाढ देण्याकामी यापुढे खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यास या शासन निर्णयाद्वारे निर्देशित करण्यात येत आहे :-

(i) महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे), नियम १९७१ च्या नियम ४१ मधील तरतूदीस अनुलक्षून यापुढे कब्जाहक्काने / भाडेपट्टयाने प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीवरील बांधकामाबाबत जमीन प्रदानाच्या आदेशामध्ये जमिनीचा प्रत्यक्ष ताबा दिल्यापासून ३ वर्षाच्या आत इमारत बांधकाम पूर्ण करण्यात यावे अशी अट समाविष्ट करण्यात यावी.

(ii) संबंधित व्यक्ती/संस्था यांनी शासकीय जमीन प्रदान आदेशात नमूद केलेल्या कालावधीत इमारत बांधकाम पूर्ण न केल्यास, त्यांनी अशा इमारत बांधकामासाठी जिल्हाधिकारी यांच्याकडून मुदतवाढ प्राप्त करुन घेणे अनिवार्य राहील. संबंधित जिल्हाधिकारी यांच्या स्तरावरुन अशी मुदतवाढ मंजूर करताना खालील नमूद दराप्रमाणे अधिमूल्य आकारण्यात यावे:-

| अ.क्र. | बांधकाम मुदतवाढीचा कालावधी | मुदतवाढीसाठी आकारावयाच्या अधिमूल्याचा दर | बांधकाम मुदतवाढीस मान्यता देण्यास सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|
| १ | **मूळ मंजूर कालावधीनंतर** प्रथम मुदतवाढ २ वर्षे | प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार सबंधित जमिनीच्या येणाऱ्या किंमतीच्या २ % प्रतिवर्ष | संबंधित जिल्हाधिकारी |
| २ | द्वितीय मुदतवाढ २ वर्षे | प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार सबंधित जमिनीच्या येणाऱ्या किंमतीच्या ३ % प्रतिवर्ष | संबंधित जिल्हाधिकारी |
| ३ | तृतीय मुदतवाढ २ वर्षे | प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार सबंधित जमिनीच्या येणाऱ्या किंमतीच्या ५ % प्रतिवर्ष | संबंधित जिल्हाधिकारी |
| ४ | चौथी मुदतवाढ २ वर्षे | प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार सबंधित जमिनीच्या येणाऱ्या किंमतीच्या ७ % प्रतिवर्ष | संबंधित जिल्हाधिकारी |
| ५ | पाचवी मुदतवाढ २ वर्षे | प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार सबंधित जमिनीच्या येणाऱ्या किंमतीच्या १० % प्रतिवर्ष | संबंधित जिल्हाधिकारी |

मात्र, संबंधित अर्जदार व्यक्ती/संस्था यांनी जिल्हाधिकारी यांच्याकडे मुदतवाढीसाठी केलेल्या अर्जात नमूद केलेले कारण त्यांच्या आवाक्याबाहेरील अथवा हाताबाहेरील असल्याची जिल्हाधिकाऱ्यांची खात्री होत असल्यास तसे कारणांसह लेखी नमूद करून बांधकाम मुदतवाढीपोटी अधिमूल्यासाठी उक्त नमूद दरांच्या निम्मे दर आकारण्यात यावेत.

(iii) ज्या प्रकरणांमध्ये ***एकुण मंजूर कालावधी*** (म्हणजेच मूळ मंजूर कालावधी अधिक मंजूर मुदतवाढीचा कालावधी) संपुष्टात आल्यानंतर देखील संबंधित जमिनीवरील इमारतीचे बांधकाम नियोजन प्राधिकरणाच्या / सक्षम प्राधिकाऱ्याच्या परवानगीने सुरु होऊनही अर्धवट असेल किंवा अशा बांधकामाचा पूर्णत्वाचा दाखला संबंधित नियोजन प्राधिकरणाकडून/सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्राप्त झालेला नसेल अशा प्रकरणी बांधकाम पूर्णत्वाचा दाखला प्राप्त होईपर्यंत संबंधित व्यक्ती अथवा संस्था यांना त्या त्या वर्षाच्या वार्षिक दर विवरणपत्रानुसार सबंधित जमिनीच्या येणाऱ्या किंमतीच्या १२%या दराने प्रतिवर्ष याप्रमाणे अधिमूल्य जिल्हाधिकाऱ्याकडे भरणा करण्याच्या अटीवर मुदतवाढ अनुज्ञेय राहील.

(iv) ज्या व्यक्ती अथवा संस्था जमीन प्रदान आदेशात बांधकामासाठी विहित केलेल्या मूळ कालावधीत किंवा मंजूर वाढीव कालावधीत,सदर कालावधी संपुष्टात येण्याच्या आत, बांधकाम मुदतवाढीस अर्ज दाखल करणार नाहीत, अशा व्यक्ती अथवा संस्थांच्या बाबतीत मुदतवाढ अर्जाच्या विलंबापोटी प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार संबंधित जमिनीच्या येणाऱ्या किंमतीच्या १ % इतके विलंब शुल्क देखील आकारण्यात यावे.

(v) वरीलप्रमाणे मुदतवाढ दिल्यानंतरही संबंधित नियोजन प्राधिकरणाकडून/सक्षम प्राधिकाऱ्याकडून विकास परवानगी प्राप्त करुन बांधकाम सुरु करण्यात आले नाही, तर अशी शासकीय जमीन आहे त्या परिस्थितीत महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम १९७१ च्या नियम ४१ प्रमाणे शासन जमा करण्यात यावी व प्रतिग्रहीताकडून देण्यात आलेल्या भोगवटा किंमतीपेक्षा अधिक नसेल इतकी नुकसान भरपाईची रक्कम त्यास प्रदान करण्यात यावी.

(vi) प्रस्तुत शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकास ज्या प्रकरणात इमारत बांधकाम संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या/सक्षम प्राधिकाऱ्याच्या परवानगीने सुरु होऊनही पूर्ण झाले नसेल आणि इमारत बांधकाम पूर्ण करण्यासाठी मूळ व मंजूर वाढीव कालावधी पूर्ण झाला असेल, अशा प्रकरणी संबंधित व्यक्ती अथवा संस्था यांना आणखी २ वर्षाची मुदतवाढ देण्याची विनंती जिल्हाधिकाऱ्याकडे हे धोरण लागू झाल्यापासून ६ महिन्यात करता येईल. असा अर्ज प्राप्त झाल्यानंतर प्रथम इमारत बांधकाम पूर्ण करण्यासाठीची विहित मुळ व मंजूर वाढीव मुदत संपलेल्या दिनांकापासून प्रस्तुत शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत काल्पनिक मुदतवाढ (Notional extension of time) ही ज्यावेळी मुदतवाढ देण्याचे आदेश निर्गमित करण्यात येतील, त्या वर्षाच्या संबंधित जमिनीच्या अकृषिक साऱ्याच्या १० पट इतकी रक्कम वसूल करुन देण्यात यावी व त्यापुढील दोन वर्षापर्यंतची मुदतवाढ संबधित जमिनीच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार येणाऱ्या किंमतीच्या १० % या दराने प्रतिवर्ष अधिमूल्य आणि अशा किंमतीच्या १% इतके एक रकमी विलंब शुल्क आकारुन व वसूल करुन देण्यात यावी.

अशी मुदतवाढ दिल्यानंतर देखील जर बांधकाम पूर्ण झाले नाही तर, अशा बांधकामाचा पूर्णत्वाचा दाखला संबंधित नियोजित प्राधिकरणाकडून/सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्राप्त होईपर्यंत संबंधित व्यक्ती अथवा संस्था यांना त्या त्या वर्षाच्या वार्षिक दर विवरणपत्रानुसार सबंधित जमिनीच्या येणाऱ्या किंमतीच्या १२% प्रतिवर्ष याप्रमाणे अधिमूल्य जिल्हाधिकाऱ्याकडे भरणा करण्याच्या अटीवर मुदतवाढ अनुज्ञेय राहील.

(vii) प्रस्तुत शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकास ज्या प्रकरणात नियोजन प्राधिकरणाची/सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता मिळवून इमारत बांधकाम सुरुच झाले नसेल आणि इमारत बांधकाम पूर्ण करण्यासाठी मूळ व मंजूर वाढीव कालावधी देखील पूर्ण झाला असेल, अशा प्रकरणी संबंधित व्यक्ती अथवा संस्था यांना आणखी २ वर्षाची शेवटची मुदतवाढ देण्याची विनंती जिल्हाधिकाऱ्याकडे हे धोरण लागू झाल्यापासून ६ महिन्यात करता येईल. असा अर्ज प्राप्त झाल्यानंतर प्रथम इमारत बांधकाम पुर्ण करण्यासाठीची विहित मुळ व मंजूर वाढीव मुदत संपलेल्या दिनांकापासून प्रस्तुत शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत काल्पनिक मुदतवाढ (Notional extension of time) ही ज्यावेळी मुदतवाढ देण्याचे आदेश निर्गमित करण्यात येतील, त्या वर्षाच्या संबंधित जमिनीच्या अकृषिक साऱ्याच्या २० पट इतकी रक्कम वसूल करुन देण्यात यावी व त्यापुढील दोन वर्षापर्यतची मुदतवाढ संबधित जमीनीच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार येणाऱ्या किंमतीच्या १० % या दराने प्रतिवर्ष अधिमूल्य व अशा किंमतीच्या १% इतके एक रकमी विलंब शुल्क आकारुन व वसूल करुन देण्यात यावी.

अशी मुदतवाढ दिल्यानंतर देखील जर बांधकाम सुरु झाले नाही, तर अशी शासकीय जमीन आहे त्यापरिस्थितीत उक्त नियम ४१ प्रमाणे शासन जमा करण्यात यावी व प्रतिग्रहीताकडून देण्यात आलेल्या भोगवटा किंमतीपेक्षा अधिक नसेल इतकी नुकसानभरपाईची रक्कम त्यास प्रदान करण्यात यावी.

मात्र अशी मुदतवाढ दिल्यानंतर जर सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेऊन बांधकाम सुरु झाले असेल मात्र बांधकाम पूर्ण झाले नाही, तर अशा बांधकामाचा पूर्णत्वाचा दाखला संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्राप्त होईपर्यंत संबंधित व्यक्ती अथवा संस्था यांना त्या त्या वर्षाच्या वार्षिक दर विवरणपत्रानुसार संबंधित जमिनीच्या येणाऱ्या किंमतीच्या १२% प्रतिवर्ष याप्रमाणे अधिमूल्य जिल्हाधिकाऱ्याकडे भरणा करण्याच्या अटीवर मुदतवाढ अनुज्ञेय राहील.

(viii) उक्त नमूद (v) व (vii) प्रमाणे ज्या प्रकरणी इमारत बांधकाम विहित मुदतीत सुरु न झाल्यामुळे संबंधित शासकीय जमीन शासन जमा करण्याचे आदेश काढण्यात आले असतील, अशा प्रकरणी संबंधित व्यक्ती अथवा संस्था यांना जमीन शासन जमा करण्याच्या आदेशाच्या प्राप्तीच्या दिनांकापासून ३ महिन्याच्या कालावधीत अर्ज करुन अशी जमीन पुर्नप्रदान/पुर्नदानित करण्याची विनंती शासनाकडे करता येईल. असा अर्ज प्राप्त झाल्यानंतर संबंधित व्यक्ती अथवा संस्थेला त्यावेळी प्रचलित असलेल्या शासनाच्या धोरणाप्रमाणे संबंधित जमीन पुर्नप्रदान/पुर्नदानित करण्याबाबत शासन गुणवत्तेनुसार निर्णय घेईल.

(ix) महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे), नियम १९७१ अन्वये राज्यातील शासकीय जमिनी कब्जेहक्काने अथवा भाडेपट्टयाने प्रदान करण्यात येतात. या नियमांखाली प्रदान केलेल्या शासकीय जमिनींना सदर नियमातील तरतुदी लागू होतात. त्यामुळे या नियमांतर्गत, ज्या व्यक्ती / संस्था यांना शासकीय जमिनी कब्जेहक्काने / भाडेपट्टयाने प्रदान करण्यात आलेल्या आहेत, तथापि, त्यांच्या जमीन प्रदान आदेशात, करारनाम्यात अथवा सनदेमध्ये इमारत बांधकाम पूर्ण करण्यासाठीचा कालावधी नमूद करण्यात आलेला नाही, त्यांना देखील उक्त नियमांतील नियम ४१ ची तरतूद लागू असल्याने अशा प्रकरणीही उक्त निर्देशांप्रमाणे इमारत बांधकाम मुदतवाढ प्राप्त करून घेणे अनिवार्य राहील.

०२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२७८/व्यय-९, दि.२९.९.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११११३५६५८५३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2017.01.11 16:08:41 +05'30'

**(राजेंद्र क्षीरसागर)**
**उप सचिव (महसूल)**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) महालेखापाल (लेखापरीक्षा) (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८) प्रधान सचिव (महसूल) यांचे वि.का.अ./स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.
९) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१०) सर्व विभागीय आयुक्त.
११) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व जिल्हाधिकारी/अपर जिल्हाधिकारी.
१३) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई-३२.
१४) उप सचिव(ज-१/ल-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) मंत्रालयीन सर्व प्रशासकीय विभाग,
१६) "ज" समूहातील सर्व सहसचिव/उपसचिव/कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती (कार्यासन ज-१)